**महाराष्ट्र विधानसभा आश्वासन समितीच्या <u>अहवालांतील शिफारशींच्या अंमलबजावणीबाबत</u> - समितीच्या बैठकीतील सचिवांच्या उपस्थितीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१७/५/प्र.क्र.४/सहा**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ जानेवारी, २०१७

<u>वाचा</u> :- १) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक : विसआ-२०१६/प्र.क्र.११/सहा, दिनांक २६ मे, २०१६.
२) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक : विसआ-२०१६/प्र.क्र.११/सहा, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१६.
३) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांचे क्रमांक : ५१७७७/विसआस/ ड-१४, दिनांक ३० डिसेंबर, २०१६ चे पत्र.

**<u>शासन परिपत्रक</u> :-**

सन २०१४ च्या पहिल्या (अर्थसंकल्पीय) अधिवेशनातील आश्वासनांसंबंधीचा सहावा अहवाल दिनांक १५ डिसेंबर, २०१६ रोजी विधानसभा सभागृहात सादर करण्यात आलेला आहे. विधानसभा आश्वासन समितीने त्यांच्या अहवालात नमूद केलेल्या सर्वसाधारण शिफारशींनुसार आश्वासनांची पूर्तता विहीत मुदतीत (९० दिवस) करणे शासनाची वैधानिक जबाबदारी आहे. तसेच, आश्वासनांची पूर्तता ही विषयाच्या अनुषंगाने सुसंगत व परिपूर्ण असण्याबाबत या विभागामार्फत वेळोवेळी शासन परिपत्रके प्रसृत केली असून, यासंदर्भात अलिकडेच उक्त अनुक्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये पुनश्च: सूचना दिलेल्या आहेत. तथापि, मंत्रालयीन विभागांकडून आश्वासनांच्या संदर्भात केल्या जाणाऱ्या कार्यवाहीबाबत बऱ्याच वेळा आश्वासनांचा विषय व त्याच्या पूर्ततेबाबत तफावत दिसून येते. आश्वासन समितीच्या असे निदर्शनास आले आहे की, विभागाचे संबंधित अधिकारी हे वेळ मारुन नेण्यासाठी समितीपुढे हलगर्जीपणाने आश्वासनांची पूर्तता करीत असतात. आश्वासन समितीने दिलेल्या निदेशांचे अनुपालन होत नसल्याने, त्यासंदर्भात आश्वासन समितीने सादर केलेल्या नमूद अहवालात तीव्र नापसंती व्यक्त केली आहे.

आश्वासन समितीने त्यांच्या उक्त अहवालात, मंत्रालयीन विभागांच्या साक्षीसंदर्भात समितीसमोर उपस्थित रहाण्याबाबत संबंधित विभागांच्या जबाबदार अधिकाऱ्यांकडून (प्रधान सचिव/सचिव) गांभीर्याने पालन केले जात नसल्यामुळे, त्याबाबत प्रशासकीय विभागांचे लक्ष वेधण्याकरिता पुढीलप्रमाणे विशेष शिफारस केलेली आहे.

**<u>विशेष शिफारस</u> :-**

आश्वासन समितीने आयोजित केलेल्या विभागांच्या साक्षीच्या वेळी संबंधित अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांनी उपस्थित असणे अभिप्रेत आहे. अपरिहार्य परिस्थितीत जर त्यांना समितीच्या कामकाजात उपस्थित राहता येणे शक्य नसेल तर त्याबाबत तीन दिवस अगोदर समितीला कळविणे आवश्यक आहे. तथापि, बहुतांश अधिकारी ऐन वेळी अनुपस्थितीबाबत समितीस कळवून त्यांच्याऐवजी अधिनस्त अधिकाऱ्यांना (सह सचिव/उप सचिव) समितीसमोर उपस्थित राहण्यास सांगितले जाते. त्यांच्या कडून समितीच्या कामकाजासाठी अपेक्षित माहिती प्राप्त होत नाही. त्यामुळे निर्णयाविना समितीस बैठक स्थगित करावी लागते. परिणामी, समितीपुढील प्रलंबित कामांची संख्या वाढत असल्याने, समितीने तीव्र नापसंती व्यक्त केली आहे. संसदीय लोकशाहीत समित्यांचे अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेता, राज्यशासनाचे अधिकाऱ्यांनी समितीसमोर उपस्थित राहून समितीच्या

कामकाजासंदर्भात यथायोग्य उत्तरे देऊन समितीच्या कामकाजात सहकार्य करणे आवश्यक आहे. यास्तव, विभागाच्या संबंधित अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांनी साक्षीस उपस्थित राहणे अत्यंत आवश्यक आहे, अशी समितीने विशेष शिफारस केली आहे.

समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने या विभागामार्फत यापूर्वी शासन परिपत्रकांद्वारे वेळोवेळी सर्व मंत्रालयीन विभागांना सूचना देण्यात आल्या आहेत. त्यासह, विधानसभा आश्वासन समितीने निदेशित केलेल्या उक्त **विशेष शिफारशीचे गांभीर्याने** अनुपालन करण्याची दक्षता सर्व मंत्रालयीन विभागांच्या सचिवांनी घ्यावी.

प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०११२१६५९१४१२१५ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash H Mali

Digitally signed by Prakash H Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary And Parliamentary Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e85fdfbd0e10cbf8ce0b6b1ea70284101ea5028574693060eee765af99a53bb6, cn=Prakash H Mali
Date: 2017.01.12 17:06:36 +05'30'

**( प्रकाश हिं. माळी )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
२) सर्व मंत्रालयीन विभाग
३) प्रधान सचिव/सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०० ०३२. (पत्राद्वारे)
४) निवड नस्ती.